निवडसूची-२०१४-२०१५
उप संचालक भूमि अभिलेख गट-अ संवर्गात तात्पूरती पदोन्नती ने पदस्थापना देण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन आदेश क्रमांक - आस्था-२०१४/९१३/प्र.क्र.२५२/ई-६
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २५ ऑक्टोबर,२०१६

शासन आ दे श :-

जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख या संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकारी यांना उप संचालक भूमि अभिलेख या संवर्गात (वेतनबॅन्ड १५,६००-३९,१०० ग्रेड पे ६,६००) तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देऊन, त्यांची स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे. हे अधिकारी ज्या तारखेला त्या पदाचा कार्यभार घेतील त्या तारखेपासून त्यांची तात्पूरत्या स्वरूपात पदोन्नती समजण्यात यावी.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण केलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.मिलींद नारायण चव्हाण | जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख, रत्नागिरी | उपसंचालक भूमि अभिलेख नाशिक प्रदेश, नाशिक | **निलंबनामुळे रिक्त असलेल्या पदावर** |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांना उप संचालक भूमि अभिलेख पदावर देण्यात आलेली पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. या पदोन्नतीमुळे सेवाज्येष्ठता आणि संबंधित कोणत्याही प्रकारचे अधिकार त्यांना प्राप्त होणार नाहीत.

३. सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय,मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र. २७९७/२०१५ (महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर) मधील मा. महाराष्ट्र प्रशासकिय न्यायाधिकरण, मुंबई येथील टी.ए.क्र.१ व २/२०१४ च्या निर्णयाच्या अधीन राहील.

४. पदोन्नत अधिकारी एक महिन्याच्या कालावधीत नियुक्तीच्या पदावर हजर न झाल्यास त्यांनी पदोन्नती नाकारली असे गृहीत धरून पदोन्नती रद्द करण्यात येईल.

५. सदर पदोन्नती ही वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे सेवेत ठेवण्याबाबतच्या तत्संबंधीच्या आदेशाच्या अधीन राहील.

६. सदर पदोन्नती ही " महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळ सेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम-२०१५" दिनांक २८.४.२०१५ मधील नियम ११ (२) व दिनांक १६.०७.२०१५ च्या सुधारणेनुसार महसूली विभाग वाटप करण्यात आलेले आहे.

७.	पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांनी उप संचालक भूमी अभिलेख या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर सदर अधिकारी यांची प्रचलित नियमानुसार वेतननिश्चिती करावी.

८.	संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी मूळ कार्यालयाने कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नविन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख,पुणे यांनी शासनास त्वरित अवगत करावे.

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१६१०२५१७२०२९१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2016.10.25 17:26:04 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) उपसंचालक भूमि अभिलेख,कोकण, नाशिक (द्वारा जमाबंदी आयुक्त,पुणे)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१/२,मुंबई,नागपूर
४) संबंधीत अधिकारी (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा.पुणे)
५) खाजगी सचिव, मा. मंत्री (महसूल) , मंत्रालय, मुंबई - ३२.
६) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती ई-६ कार्यासन, महसूल व वन विभाग.